महाराष्ट्र वैद्यकीय सेवा (वैद्यकीय देखभाल) १९६१
अन्वये प्राधिकृत वैद्यकीय अधिकाऱ्याची व्याख्या-
एकत्रित आदेश

महाराष्ट्र शासन,
सार्वजनिक आरोग्य विभाग,
शासन निर्णय क्र.एमएजी १०९९/ प्र.क्र.२२२/आरोग्य-३
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२
दिनांक:- २० ऑगस्ट,१९९९

शासन निर्णय :- शासन निर्णय क्र. १) एमएजी १०८७/ २६५५/ आरोग्य-९, दिनांक ३० जून,१९८७. २) एमएजी १०८६/ ३४३७/आरोग्य-९, दिनांक ३० जुलै १९८७, ३)एमएजी १०८७/ २५५/ आरोग्य-९, दिनांक ५जानेवारी १९८८ व ४) संकीर्ण १०९९/ सीआर-१३८/ आरोग्य-३, दिनांक २९ एप्रिल १९९९ अन्वये प्राधिकृत वैद्यकीय अधिकारी म्हणून निरनिराळे वैद्यकीय अधिकारी घोषित करण्यात आले आहेत. हे सर्व आदेश रद्द करण्यात येत आहेत व या सर्वांचे एकत्रिकरण करुन पुढील सविसतर आदेश निर्गमित करण्यात येत आहेत.

मुंबई शहराच्या बाबतीत शासकीय रुग्णालयांचा अधिक्षक किंवा त्यांनी प्राधिकृत केलेले वैद्यकीय अधिकारी हे प्राधिकृत वैद्यकीय अधिकारी मानण्यात यावेत. जिल्हयाच्या ठिकाणी जिल्हा शल्यचिकित्सक व त्यांनी प्राधिकृत केलेले वैद्यकीय अधिकारी हे प्राधिकृत वैद्यकीय अधिकारी म्हणून मानण्यात यावेत.

ग्रामीण रुग्णालय / कुटीर रुग्णालये व प्राथमिक आरोग्य केंद्रे यामध्ये महाराष्ट्र वैद्यकीय सेवा वर्ग-१/२/३ मध्ये काम करीत असलेले त्या ठिकाणी वरिष्ठतम वैद्यकीय अधिकारी, हे प्राधिकृत वैद्यकीय अधिकारी असतील. ज्या ठिकाणी एकच वैद्यकीय अधिकारी असेल त्या ठिकाणी ते प्राधिकृत वैद्यकीय अधिकारी असतील.

अतितात्काळ सेवेची प्रकरणे त्या त्या जिल्हयातील जिल्हा शल्यचिकित्सकांकडे पाठविण्यात यावी. ज्या ठिकाणी वैद्यकीय महाविद्यालये असतील तेथे महाविद्यालयाचे अधिष्ठाता (डीन) यांचेकडे अशी प्रकरणे पाठविण्यात यावीत. परंतु बृहन्मुंबईतील कार्यालयांनी / विभागांनी क्र.एमएजी १०९९/ प्र.क्र.१४/ आरोग्य-३, दिनांक २५फेब्रुवारी १९९९ च्या आदेशात नमूद केलेल्या रुग्णालयाकडे त्या त्या विभागांनी अशी अतितात्काळ प्रसंगाची प्रकरणे पाठवावीत. या रुग्णालयाचे अधिष्ठाता (डीन) अथवा त्यांनी घोषित केलेले वैद्यकीय अधिकारी हे प्राधिकृत वैद्यकीय अधिकारी समजण्यात येतील.

महाराष्ट्र राज्य सेवा (वैद्यकीय देखभाल) नियम १९६१ च्या नियम २(५) अन्वये शासकीय रुग्णालयाच्या व्याख्येत राज्यातील सर्व नगरपालिका, महानगरपालिका, जिल्हापरिषदा यांच्या रुग्णालयांचा समावेश होतो. त्यामुळे तेथील वैद्यकीय अधिकारी हे प्राधिकृत वैद्यकीय अधिकारी आहेत. त्यांच्या शिफारशीनुसार घेतलेल्या वैद्यकीय खर्चाची प्रतिपूर्ती शासकीय कर्मचाऱ्यांना देय आहे.

शासन निर्णय क्र.संकीर्ण १०९९/ सीआर १३८/ आरोग्य-३, दिनांक २९ एप्रिल, १९९९ अन्वये विकलांग व्यक्ती (समान संधी, हक्कांचे संरक्षण व संपूर्ण सहभाग) अधिनियम,१९९५ अन्वये

१) अ) राज्यातील जिल्हा सामान्य रुग्णालये,

व

ब) राज्यातील वैद्यकीय महाविद्यालयांना संलग्न असलेली रुग्णालये, ही उक्त अधिनियमाच्या प्रयोजनार्थ वैद्यकीय प्राधिकरणे म्हणून राहतील.

एच-642(इ)(3500-8-99)-1
Medical Reimbursments

20030820133349001-1900

२) अ) जिल्हा सामान्य रुग्णालयांकरिता जिल्हा शल्यचिकित्सक

व

ब) राज्यातील वैद्यकीय महाविद्यालयांना संलग्न असलेल्या रुग्णालयाकरीता वैद्यकीय अधिक्षक हे उपरोक्त कलम २ च्या उपकलम (टी) च्या प्रयोजनार्थ प्रमाणित करण्यासाठी प्राधिकारी राहतील.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

(एल.जी.इप्पेवार)
महाराष्ट्र शासनाचे अवर सचिव

प्रति,
मुख्य सचिव, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई
प्रधान सचिव, वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई.
सचिव, (सर्व मंत्रालयीन विभाग),मंत्रालय, मुंबई.
सचिव, राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई (दोन प्रती)
मुख्यमंत्र्यांचे सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई
मुख्यमंत्र्यांचे खाजगी सचिव, मुख्यमंत्री सचिवालय, मुंबई
मंत्री (आरोग्य) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई
राज्यमंत्री (आरोग्य) यांचे स्वीय सहाय्यक, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्री व राज्यमंत्री यांचे स्वीय सहाय्यक
मुख्य सचिवांचे स्वीय सहाय्यक, सामान्य प्रशासन विभाग, मंत्रालय, मुंबई.

- सचिव, महाराष्ट्र लोकसेवा आयोग, मुंबई (५ प्रती)
- सचिव, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधान भवन , मुंबई (१० प्रती)
- सेंटलमेंट कमिशनर अ‍ॅण्ड डायरेक्टर ऑफ लॅड रेकॉर्डस्, पुणे (२ प्रती)

विभागीय आयुक्त (सर्व) (प्रत्येकी २ प्रती)
जिल्हाधिकारी (सर्व) (प्रत्येकी २ प्रती)
मुख्य कार्यकारी अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व) (प्रत्येकी ५ प्रती)
महालेखापाल, महाराष्ट्र-१, (लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा व परिक्षा)मुंबई (२ प्रती)
महालेखापाल, महाराष्ट्र-२,(लेखा व अनुज्ञेयता)/(लेखा व परिक्षा)नागपूर (२ प्रती)
सहसंचालक, अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (१० प्रतीद)
अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई (१० प्रती)
चिफ ऑडीटर, लोकल फंडस् अकाऊंटस्, मुंबई (१० प्रती)
कोषागार अधिकारी (सर्व) (प्रत्येकी ५ प्रती)
संचालक, आरोग्य सेवा, मुंबई (५० प्रती)

संचालक, वैद्यकीय शिक्षण व संशोधन, मुंबई (५० प्रती)
संचालक, आयुर्वेद, मुंबई (२५ प्रती)
संचालक, राज्य कामगार विमा योजना, मुंबई (२५ प्रती)
व्यवस्थापकिय संचालक, हाफकीन बायो-फार्मास्युटिकल कॉर्पोरेशन,परेल,मुंबई (२ प्रती)
अतिरिक्त संचालक, आरोग्य सेवा (सर्व)
महासंचालक, माहिती व जनसंपर्क मंत्रालय, मुंबई (५ प्रती)
सहसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
उपसंचालक, आरोग्य सेवा (सर्व)
अधिष्ठाता, शासकिय वैद्यकिय महाविद्यालय, (सर्व)
जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषद (सर्व)
जिल्हा शल्यचिकित्सक, जिल्हा रुग्णालय (सर्व)
- प्रबंधक, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई (५ प्रती)
- प्रोथोनोटरी व सिनियर मास्टर, मुंबई उच्च न्यायालय, मुंबई (५ प्रती)

वित्त विभाग (कार्यासन सेवा ५), मंत्रालय, मुंबई (१० प्रती)
व्यवस्थापक, शासकिय मध्यवर्ती मुद्रणालय, मुंबई
सर्व कार्यासन अधिकारी, सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
सर्व मंत्रालयीन विभाग (आस्थापना कार्यासन), मंत्रालय, मुंबई (५० प्रती)

२. मंत्रालयीन विभागाच्या सर्व आस्थापना कार्यासनास विनंती करण्यात येते की, त्यांनी शासन निर्णयाच्या प्रती त्यांच्या सर्व संबंधित कार्यासनाना पाठवाव्यात. तसेच संबंधित कार्यासनाने त्यांच्या अधिपत्याखालील सर्व विभाग प्रमुख व कार्यालय प्रमुख यांना पाठवाव्यात.

प्रत :- निवड नस्ती (महत्वाचे आदेश), सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
निवड नस्ती (आरोग्य-३) सार्वजनिक आरोग्य विभाग, मंत्रालय, मुंबई
- (पत्राने)

---------

एच-642(इ)(3500-8-99)-2.